**महाराष्ट्र पोलीस अ‍ॅकॅडमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर राखीव पोलीस निरीक्षक व राखीव पोलीस उप निरीक्षक यांची पदे वर्ग करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-०२२३/प्र.क्र.६७/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : १८ ऑगस्ट, २०२३.

__वाचा__ :-

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं-२६ ब/ मपोअ/नाशिक पदे वर्ग/१५/२०२१, दि.२३/०९/२०२२.
२) वित्त विभाग, शासन निर्णय,क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२/०६/२०१५.
३) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांकः टीईएक्स-०३९६/सीआर १३/ पोल-५अ, दिनांक २६/०४/१९९७.
४) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांकः एपीओ-३११०/प्र.क्र.४२८/पोल-३,दि.१५/०६/२०११.
५) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक :एपीओ-३११०/प्र.क्र.४२८/पोल-३, दि.२५/०७/२०११.

__प्रस्तावना__ :-

पोलीस महासंचालक कार्यालयाने संदभाधीन क्र.१ च्या पत्रान्वये अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील पोलीस प्रशिक्षण केंद्रातील राखीव पोलीस निरीक्षक व राखीव पोलीस उप निरीक्षक यांची पदे महाराष्ट्र पोलीस अ‍ॅकॅडमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वर्ग करण्याबाबतची विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

__शासन निर्णय__:-

अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील खालील विवरणपत्रात नमूद पोलीस प्रशिक्षण केंद्रातील राखीव पोलीस निरीक्षक यांची ५ पदे व राखीव पोलीस उप निरीक्षक यांची १० पदे महाराष्ट्र पोलीस अ‍ॅकॅडमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. राखीव पोलीस निरीक्षक

| अ.क्र. | पोलीस प्रशिक्षण केंद्र | महाराष्ट्र पोलीस ॲकॅडमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वर्ग करण्यात आलेली पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, मरोळ | ४ |
| २ | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, खंडाळा | १ |
| | **एकूण** | ५ |

२. राखीव पोलीस उप निरीक्षक

| अ.क्र. | पोलीस प्रशिक्षण केंद्र | महाराष्ट्र पोलीस ॲकॅडमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वर्ग करण्यात आलेली पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, मरोळ | ३ |
| २ | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, सोलापूर | ५ |
| ३ | प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, लातूर | २ |
| | **एकूण** | १० |

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१८१६४९५५०५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.08.18 16:52:58 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८) अपर पोलीस महासंचालक (नि. व. स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१०) संचालक, महाराष्ट्र पोलीस ॲकॅडमी, नाशिक.

११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.

१३) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

१४) सह सचिव(पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई

१५) वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.

१६) निवड नस्ती, पोल-३.